**शैक्षणिक वर्ष २०११-१२**
**नवीन व्यावसायीक महाविद्यालयांना**
**मंजूरी**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
आदेश क्रमांक:एनजीसी २०११/ (१२२/११)/ मशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०२ जानेवारी, २०१२

पहावे : १) मुंबई विद्यापीठ, मुंबई यांचे पत्र क्र. संलग्नता/मान्यता-१/१९८३/२०११, दि.२९.४.२०११

**आदेश**

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२ (४) नुसार राज्यातील विद्यापीठांनी नवीन व्यावसायीक महाविद्यालय मान्यतेसाठीचे प्रस्ताव शासनास सादर करावयाचे असतात. शैक्षणिक वर्ष २०११-१२ साठी विविध शैक्षणिक संस्थाकडून राज्यातील विद्यापीठांकडे प्राप्त झालेल्या प्रस्तावांची शासन निर्णय क्र. एनजीसी २०१०/(१९३/१०)/ मशि ४, दिनांक ३० ऑक्टोबर, २०१० अन्वये विद्यापीठकडून छाननी करण्यात आली. छाननी करण्यात आलेले प्रस्ताव संबंधित अकृषि विद्यापीठाकडून दि. १.५.२०११ पूर्वी शासनास शिफारशीत झालेले आहेत. त्या प्रस्तावांपैकी महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२ (५) अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार पुढील विवरणात नमूद केल्यानुसार एक नाविन्यपूर्ण अभ्यासक्रमाचे महाविद्यालय म्हणून नवीन व्यावसायीक महाविद्यालयास खालील अटी व शर्तीच्या अधीन **कायम विना अनुदान तत्वावर** मंजूरी देण्यात येत आहे:-

**मुंबई विद्यापीठ, मुंबई**

| अ.क्र | संस्थेने नांव व पत्ता | प्रस्तावित महाविद्यालयाचे ठिकाण | विद्याशाखेचे महाविद्यालय |
|---|---|---|---|
| १. | प्रवरा रुरल एज्युकेशन सोसायटी एअरपोर्ट रोड, पो. एअरफोर्स स्टेशन ओझर, ता. निफाड, जि.नाशिक - ४२२ २२१ | एअरफोर्स स्टेशन ओझर, ता. निफाड,जि.नाशिक | बी.एस्सी. (एरोनॉटिक्स), |

३. अटी व शर्ती :

(१) ज्या संस्थेला नवीन व्यावसायीक महाविद्यालय मंजूर करण्यात आले आहे, त्या संस्थेनी ती भविष्यात कोणत्याही अनुदानाची मागणी करणार नाहीत असे विनाअट हमीपत्र सहसंचालक, उच्च शिक्षण, यांचेकडे सादर करावे.

(२) संबंधित विभागीय सहसंचालकाचे वरील अ.क्र. १ मध्ये नमूद केलेले हमीपत्र सादर केल्याविषयीचे पत्र प्राप्त झाल्याशिवाय विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.

(३) महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

(४)विद्यापीठाने विहित केलेल्या निकषानुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक वर्ग / कर्मचारी वर्ग संस्थेने नेमणे आवश्यक असून इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात.

(५) विद्यापीठ अनुदान आयोगाच्या यु.जी.सी. (ॲफिलिएशन ऑफ कॉलेजेस बाय युनिव्हरसिटीज) रेग्युलेशन २००९ मध्ये महाविद्यालयाला संलग्निकरण देण्याबाबत विहित केलेल्या निकषांची पुर्तता केल्याशिवाय संबंधित व्यावसायीक महाविद्यालयास संलग्निकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये. तसेच विद्यापीठाचे संलग्नीकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही करण्यापूर्वी विद्यापीठाने शासनाच्या मान्यतेबाबतचे आदेश शासनाच्या संकेतस्थळावर अवलोकन करुन परवानगी बाबत खात्री करुन घ्यावी. विद्यापीठाने संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांना पाठवावा.

४. हे आदेश, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१२०१०२३०४०१७१८००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सदाशिव शिवदास)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

(१) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
(२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
(३) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई
(४) संबंधित संस्था